केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री पोषण शक्ती (PM-POSHAN) पूर्वीची शालेय पोषण आहार योजनेअंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाचा सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत.
केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २२०२आय७६४)
राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२०२आय७७३)

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :-३० मे, २०२३

वाचा :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३
२) केंद्र शासन, शिक्षण मंत्रालयाचे पत्र क्र.F.No.३-४/२०२२-Desk (PMP), दि.३०.०३.२०२३ व दि.३१.०३.२०२३
३) शालेय शिक्षण विभागाची नस्ती क्र.शापोआ-२०२२/प्र.क्र.१२७/एस.डी.३

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. अनुसूचित जाती उप योनजेंतर्गत शालेय शिक्षण विभागाकडून अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री पोषण शक्ती (PM-POSHAN) पूर्वीची शालेय पोषण आहार या योजनेसाठी अनुसूचित जाती घटकासाठी केंद्र हिस्सा रु.१०२६४.९८ लाख व राज्य हिस्सा रु.७३३३.७६ लाख वितरीत करण्याबाबत शालेय शिक्षण विभागाकडून संदर्भाधीन क्र.३ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री पोषण शक्ती (PM-POSHAN) पूर्वीची शालेय पोषण आहार या योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२०२, सर्वसाधारण शिक्षण मधील मध्यान्न भोजन योजनेंतर्गत सन २०२३-२४ च्या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून केंद्र व राज्य हिश्याचा निधी वितरणास वित्त विभागाने मान्यता दिल्याने केंद्र व राज्य हिस्सा यासाठी खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये लाखात)**

| क्र. | योजनेचे नांव व लेखाशिर्ष | सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पीय तरतूद | या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|
| १ | मध्यान्न भोजन योजना (केंद्र हिस्सा ६०%) (२२०२आय७६४) | १३२४२.९९ | १०२६४.९८ |
| २ | मध्यान्न भोजन योजना (राज्य हिस्सा ४०%) (२२०२आय७७३) | ८८२८.०० | ७३३३.७६ |
| | **एकुण** | **२२०७०.९९** | **१७५९८.७४** |

२. उपरोक्तप्रमाणे एकूण रु.१७५९८.७४ लाख (अक्षरी रुपये एकशे पंच्याहत्तर कोटी अठ्यान्नव लाख चौऱ्याहत्तर हजार फक्त) इतर निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी

वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व शालेय शिक्षण विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४९०/व्यय-१४, दि.२७.०४.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५३०१३३४५२१४२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, pseudonym=81399435626E9FEA18299D95CAA243F02DC0029F, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2023.05.31 15:53:47 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
५) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
६) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
८) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.